**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मोहपे, ता. पनवेल, जि. रायगड नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१२१५/प्र.क्र.७३/पापु-०६

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीखः २८ जुलै, २०१५

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ अ/पापु-०७, दिनांक १७/०३/२०१०

२) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ९/१०/२०१३

३) शासन निर्णय क्रमांकः ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९/०७/२०१४

४) शासन निर्णय क्रमांकः ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ९/०७/२०१४

५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबतचा शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७/१०/२०१४

६) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृतीच्या अधिकाराबाबत शासन परिपत्रक क्र.ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६/०२/२०१५

७) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या प्रशासकीय खर्चासाठी अनुज्ञेय असलेल्या निधीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २०/०२/२०१५.

८) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणासाठी मार्गदर्शक सूचनाबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो १११४/प्र.क्र.६१/पापु-७ दिनांक १५.०६.२०१५

९) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मंबई यांचे पत्र क्र. पापुशा/प्र.क्र. १६६/२०१५/वासो-०१, दिनांक १३.०७.२०१५

१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड, यांचे पत्र क्र. राजिप /ग्रापापु / वशी / प्रशा-४/ /२०१४, दि.१३/०४/२०१४

**प्रस्तावना-**

**मोहपे, ता.पनवेल, जि. रायगड नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.२२,०४,४४८/- किंमतीच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रायगड यांनी माहे एप्रिल, २०१५ रोजी तांत्रिक मान्यता दिली आहे. ग्रामसभेच्या मागणीनुसार ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेची नळ पाणी पुरवठा योजना संदर्भ क्र. १० च्या पत्रान्वये शासनाकडे प्रस्तावित करण्यात आली आहे. सदर योजनेचा दरडोई खर्च हा रुपये ४४०९/- इतका असून, हा खर्च विभागाने**

**संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या निकषाच्या १०० % मर्यादेपेक्षा (रु. ३९७८/-) जास्त आहे. या शासन निर्णयाच्या तरतुदीनुसार १०० % पेक्षा अधिक दरडोई खर्च असणाऱ्या योजनांच्या प्रस्तावांना प्रधान सचिव (वित्त), प्रधान सचिव(नियोजन) व प्रधान सचिव (पा.पु.व स्व) यांचा समावेश असलेल्या उच्चाधिकार समिती मार्फत मान्यता देण्यात येईल असे निदर्शित केले आहे. त्यामुळे रुपये २२,०४,४४८/- इतक्या ढोबळ किंमतीच्या व योजनेचा दरडोई खर्च रु. ४४०९/- असलेल्या मौजे मोहपे, ता. पनवेल, जि. रायगड नळ पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव उच्चाधिकार समिती समोर मान्यतेस्तव सादर करुन वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.**

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, शासन निर्णय क्र. २ नुसार विहित केलेल्या दरडोई खर्चाच्या १००% हून अधिक दरडोई खर्च असणाऱ्या योजनांच्या प्रस्तावांना मान्यता देण्यासाठी सदर त्रिसदस्यीय उच्चाधिकार समितीची बैठक दिनांक ०५ मे, २०१५ रोजी घेण्यात आली.

सदर बैठकीत मौजे मोहपे, ता.पनवेल, जि. रायगड नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.४४०९/- एवढ्या दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या **रु.२२,०४,४४८/- (अक्षरी रुपये बावीस लक्ष चार हजार चारशे अठ्ठेचाळीस फक्त )** इतक्या ढोबळ किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

*२.* संदर्भाधिन अनु क्र.४ मधील शासन निर्णयाद्वारे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पूर्णत: रद्द करण्यात आलेली आहे. त्यामुळे प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र.४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

*३.* **सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१. संदर्भ क्र. ०९ येथील शासन पत्रान्वये दिलेल्या सुचनांनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, रायगड जिल्हा परिषद, अलिबाग यांची राहील.

२. सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषद, रायगड यांनी करावी. योजना पुर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, यांची खात्री जिल्हा परिषदेने करावयाची आहे. सदर पाणी पुरवठा योजना पूर्ण झाल्यानंतर संदर्भाधिन अनु.क्र.५ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे योजना चालविणे, योजनेचे हस्तांतरण करणे, योजनेची देखभाल दुरुस्ती करणे याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

३. योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र.४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

४. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी किमान **रु.२२००/- प्रति वर्ष प्रति कुटुंब एवढी**

**पाणीपट्टी निश्चित करावी व त्यात टप्प्याटप्प्याने वाढ करण्यात यावी . सदर पाणीपट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी, रायगड जिल्हा परिषद, अलिबाग यांनी स्वत: करावी.** योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

५. योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

६. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

७. गाव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

९. योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. उद्भव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत. (उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.)

१०. जास्त दराच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. विभागाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेचे कार्यादेश देण्यात येऊ नये.

११. अस्तित्वातील स्त्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

१२. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे द्यावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१३. सदर योजनेचा समावेश सन २०१४-१५ च्या कृती आराखड्यात आहे, याबाबतची खात्री जिल्हा परिषदेने करावी.

१४. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधिन अनु.क्र.३ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांची पुर्तता करण्यात यावी.

१५. संदर्भ क्र. ८ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार सदर नळ पाणी पुरवठा योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण करण्याची तसेच पाणी पुरवठा व स्वछता विभागाने दिलेल्या सुचनांचे पालन करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, रायगड जिल्हा परिषद, अलिबाग यांची राहिल.

*४.* या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा. राज्य हिश्याची तरतूद राज्य स्तर तसेच जिल्हा परिषद, रायगड यांनी त्यांना जिल्हा नियोजन समितीमार्फत उपलब्ध होणा-या निधीमधून करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२८१४४९२५७५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.07.31 11:37:14 +05'30'

( रा. अ. साबणे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य.
३. मा. प्रधान सचिव (पा.पु. व स्व.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण.
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, रायगड
७. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, रायगड जिल्हा परिषद, अलिबाग.
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर.
१०. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
११. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रायगड.
१२. अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, बेलापूर, नवी मुंबई.
१३. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
१४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रायगड.
१५. महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई (लेखापरीक्षा व अनुज्ञेयता)
१६. महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता)
१७. मुख्य अभियंता तथा वि.का.अ.(पा.पु.व स्व.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन पापु-०१/०४/०५/०९/१३/१७ व १८.
१९.निवड नस्ती (पापु-०६ कार्यासन), पा.पु. व स्व. वि., मंत्रालय, मुंबई ३२.